# समुद्रातील घरे

लेखक : ॲलिस गौडे

चित्रे : ॲड्रीयन ॲडम्स

मराठी : सुशील मेन्सन

हे पुस्तक दोन मुलांबद्दल आहे. ही मुले समुद्रानजिक राहातात. समुद्राच्या उंच लाटा रोज किनाऱ्यावर येतात आणि मागे परतताना असंख्य शिंपले किनाऱ्यावरील वाळूत सोडून जातात. मुले आश्चर्याने शिंपल्यांचे सौंदर्य डोळ्यांत टिपून घेतात. वेगवेगळ्या आकाराचे शिंपले. वेगवेगळ्या रंगांचे शिंपले. प्रत्येक शिंपला हा कधी काळी कुणा एखाद्या छोट्याशा जीवाचे घर होते.

जेव्हा तुम्ही हे पुस्तक वाचाल आणि त्यातील सुंदर सुंदर चित्रे पाहाल, तेव्हा तुम्हीसुद्धा त्या मुलांसारखे शिंपल्यांबद्दल विचार करू लागाल. या शिंपल्यांना ज्या नावांनी ओळखले जाते, ती नावे आली कुठून? असे प्रश्न तुम्हाला पडतील. एका शिंपल्याचे नाव आहे, टाईनी स्लीपर (छोटी चप्पल)! दुसरा एक शिंपला अगदी वक्राकार जिन्यासारखा दिसतो.

त्या दिवशी मुलांनी काही शिंपले गोळा केले. मग ते दररोज शिंपले जमवू लागले आणि त्यांच्या या संग्रहात दिवसेंदिवस वाढ होऊ लागली. पुस्तकाच्या शेवटच्या दोन पानांवर शिंपल्यांची रंगीत चित्रे आणि त्यांची नावे आहेत. शिंपले कसे बनतात? त्यांची वेगवेगळी रुपे कशी बनतात? ही रहस्येदेखील या पुस्तकातून उलगडतात.

तुम्ही समुद्राजवळ राहात नसलात तरी तुम्ही या शिंपल्यांना एखाद्या वस्तुसंग्रहालयात पाहू शकता आणि त्यांचा आनंद घेऊ शकता.

# समुद्रातील घरे

लेखक : ॲलिस गौडे

चित्रे : ॲड्रीयन ॲडम्स

मराठी : सुशील मेन्सन



# लेखकाचे मनोगत

समुद्रकिनारी चालताना तुम्हाला वाळूत किंवा खडकांमध्ये अनेक शिंपले दिसले असतील. तुम्ही एखादा शिंपला उचलता, त्याचे सौंदर्य टिपता आणि विचार करता की हा शिंपला कधीकाळी एखाद्या जीवाचे घर असेल. तो सुंदर शिंपला तिथेच टाकून द्यायला तुमचे मन तयार होत नाही. त्यामुळे तुम्ही त्याला खिशात ठेवता. तिथून पुढे चालत गेल्यावर तुम्हाला आणखी एक छानसा शिंपला दिसतो. पुढे मिळणारा प्रत्येक शिंपला तुम्हाला आधीच्या शिंपल्यापेक्षा जास्त सुंदर दिसतो. हळूहळू तुमचा खिसा शिंपल्यांच्या खजिन्याने उतू जाऊ लागतो. ही तुमच्या शिंपल्याच्या संग्रहाची सुरुवात असते.

शिंपले गोळा करणे आणि त्यात कोणते जीव राहातात याबाबत जाणून घेणे, हा जगभरातील अनेक लोकांचा आवडता छंद आहे.

शिंपले, इतर जीवांसारखेच, वेगवेगळ्या कुटुंबांचे सदस्य आहेत. एकाच कुटुंबातील शिंपले देशातील वेगवेगळ्या किनाऱ्यांवर सापडू शकतात.

तुम्ही कदाचित समुद्रकिनारी राहात नसाल आणि या मुलांसारखे नशीबवान नसाल. तुम्हाला कदाचित एकाच दिवशी, एकाच स्थानावर सगळ्या प्रकारचे शिंपले मिळणार नाहीत. पण एखाद्या दिवशी एखादे वादळ जगाच्या दुसऱ्या कोपऱ्यातील शिंपले तुमच्या किनाऱ्यावर आणून सोडेल.

या पुस्तकात आपण शिंपल्यांची सामान्य नावे वापरली आहेत. शिंपल्यांविषयी विस्तृत माहिती तुम्हाला ग्रंथालयातील अनेक पुस्तकांमध्ये मिळू शकेल.

आम्ही आमच्या बादल्या आणि फावडे घेऊन समुद्रकिनारी गेलो तेव्हा लाटा आम्हाला भेटायला आल्या. आम्ही आल्याचा जणू त्यांना आनंद झाला होता. फसफस, बुडबुड असे आवाज करत लाटांचा पांढराशुभ्र फेस आमच्या पावलांच्या सभोवती नाचू लागला.

आणि मग, लाटा पुन्हा समुद्रात विलिन झाल्या.

माझ्या बहिणीने लाटांना हाक दिली आणि ती मोठ्याने ओरडली, "परत या! कृपया, परत या आणि आमच्यासोबत खेळा!"

समुद्राने जणू माझ्या बहिणीची हाक ऐकली. कारण काही क्षणांतच एक उंच लाट परत किनाऱ्यावर आली.

पण....

....लाट आली खरी, पण समुद्राने जणू आपल्या अदृश्य हातांनी पुन्हा तिला आपल्यात खेचून घेतलं.

आमचा मित्र, समुद्र, आमच्याशी खेळायला थांबला नाही तरी त्याने आपल्यासोबत मोठा खजिना किनाऱ्यावर आणला आणि आमच्यासाठी तो वाळूवर सोडून गेला.

आम्हाला *मून शेल्स (चंद्र शिंपले)* मिळाले. ते गुळगुळीत आणि गोल आकाराचे होते. ते आमच्या हातात सहज मावले. कधीकाळी त्यात राहाणारे छोटे जीव कुठेतरी निघून गेले असावेत. आता त्यांची ही समुद्रातून आलेली घरं आम्ही आमच्याजवळ ठेवू शकत होतो. आम्ही दोन्ही मून शेल्स आमच्या बादलीत ठेवले, आणि मग....





....आणखी एक लाट किनाऱ्यावर आली.

आम्हाला एक पक्षी दिसला – *सँडपायपर* – जो लहानसहान किड्यांची आणि हिप्पा खेकड्यांची शिकार करत होता. तो वाळूवर लाटांच्या पुढे पुढे पळत होता. त्याचे पाय अगदी काडेपेटीतल्या काड्यांसारखे बारीक दिसत होते.

लाट पुन्हा समुद्रात विलिन झाली तेव्हा आम्हाला वाळूत काही *वेज शेल्स* (पाचरीसारख्या आकाराचे शिंपले) दिसले. त्यांचे रंग खूप मोहक आणि चमकदार होते. असे वाटत होते जणू डझनभर फुलपाखरं समुद्रकिनारी आराम करण्यासाठी आली आहेत.

त्यानंतर....

समुद्राची एक उंच लाट किनाऱ्यावर आली. यावेळी लाट चमकदार *जिंगल शेल्स* (घंटेच्या आकाराच्या) शिंपल्यांचा खजिनाच मागे सोडून गेली.

रुपेरी!

सोनेरी!

घंटेच्या आकाराच्या शिंपल्यांचे रंग सुंदर आणि तेजस्वी होते. आम्ही त्यांना बादलीत टाकले, तेव्हा त्यांनी आनंदाने घंटानाद केला.



पुढे आम्हाला जो खजिना मिळाला तो सर्वात सुंदर होता. ते होते *एंजल विंग्ज* (परीचे पंख) शिंपले. ते खूप सुंदर आणि पांढरेशुभ्र होते, जणू काही स्वर्गातून थेट इथे अवतरले होते.

मग आम्हाला काही *कॉकल शेल्स* मिळाले. त्यांच्यावर बरगड्यांसारखे उंचवटे होते. त्यांच्या कडांवर आरीसारखे दात होते. जेव्हा आम्ही दोन शिपल्यांना एकत्र केले तेव्हा त्यातून ह्ृदयाच्या आकाराचे घर बनले.

पुढे आम्हाला....



....काही मौल्यवान *कवड्या* मिळाल्या.

त्या खूप चमकदार आणि गुळगुळीत होत्या. त्यांच्यावर पांढरे ठिपके होते. कवड्यांच्या दारावर छोट्या छोट्या दातांच्या दोन रांगा होत्या. मला कुणीतरी सांगितले होते की कधी काळी लोक कवड्यांचा उपयोग पैशासारखा करत –आज जसं आपण सोने आणि चांदीचा उपयोग करतो तसंच.



आम्ही लाटांसोबत किनाऱ्यावर वाहून आलेल्या अल्गीच्या खाली पाहिलं. तिथे आम्हाला दगडांना चिकटलेली कालवं दिसली. ती चीनी टोप्यांसारखी दिसत होती. त्यांच्यावर छोटी छोटी भोकं होती.





आम्हाला समुद्री अल्गींमध्ये लपेटलेले काही *पेरिविंकल शेल्स* (कालव्यांचे शिंपले) मिळाले.

अशा छोट्या घरांमध्ये गोगलगायी राहातात, हे आम्हाला माहीत होते.

वाळूत आम्हाला काही पांढरे शिंपले दिसले.

त्यांच्या नावांचा उच्चार बराच कठीण होता.

आम्ही त्यांच्यावर एक गाणं रचलं आणि ते वारंवार गाऊ लागलो.

"*वेंटलट्रॅप, वेंटलट्रॅप, वेंटलट्रॅप!*

आम्ही शोधून काढले काही *वेंटलट्रॅप!*"

हे मजेशीर नाव डच भाषेतलं आहे.

त्याचा अर्थ आहे सर्पिलाकार जिना.

काही समुद्री जीव आपल्या घरांमध्ये या जिन्याचा वापर करत असतील का, याचे आम्हाला कुतूहल होते.



आम्हाला पुढे जे शिंपले मिळाले ते *स्कॅलोप शिंपले* होते. त्यांचे काठ घड्याघड्यांचे होते.

ते स्त्रियांच्या हातातील पंख्यांसारखे दिसत होते. त्यांच्यावर वरपासून खालपर्यंत उंचवटे असलेल्या रेषा होत्या.



त्यानंतर आम्हाला मिळालेले शिंपले भोवऱ्यासारखे फिरू शकत होते.

ते *टॉप शेल्स* होते. ते एका टोकाला टोकदार होते आणि त्यांच्यावर जणू छोटे छोटे मणी लावलेली दोरी गुंडाळलेली आहे, असे दिसत होते.



मग आम्हाला ओल्या वाळूत चपलांच्या आकारचे शिंपले दिसले. ते गडद रंगांचे होते. जलपऱ्यांना या शिपंले चपला म्हणून वापरायला आवडलं असतं. त्यांच्या एका टोकाला अर्धा डेक होता. आम्हाला ती समुद्रात चालणाऱ्या नावेसारखी वाटली.





आम्ही समुद्रकिनाऱ्यावर चालू लागलो तसं पुढे अगदी वेगळ्या प्रकारचे शिंपले आम्हाला दिसले. असे शिंपले आम्ही अद्याप पाहिले नव्हते. ते टरेट शेल्स होते. ते एखाद्या ऐतिहासिक किल्ल्यावरच्या बुरुजासारखे दिसत होते. पण काही लोकांना ते सर्पिलाकार वलयं असलेल्या स्क्रूसारखे वाटतात.

आणि मग....



.... आम्हाला काही *क्लॅम शेल्स* सापडले. त्यांच्या पृष्ठभागावर छोट्या उंच रेषा होत्या. त्या तळ्यातील पाण्यावरच्या तरंगांसारख्या दिसत होत्या. हे शिंपले आतून मोत्यांसारखे चमकदार आणि पांढरे होते. त्यांचे काठ जांभळ्या रंगाचे होते. इंडियन लोक या कठीण कवचाच्या शिंपल्यात राहाणाऱ्या क्लॅम माशांना *क्वाहोग* म्हणतात.

क्वाहोग शिंपल्यांपासून इंडियन लोक खूप सुंदर , गुळगुळीत पांढरे आणि जांभळे दागिने घडवतात. ते छोट्या मोत्यांना *वँपम* म्हणतात. ते त्यांचा वापर गोऱ्या लोकांशी व्यापार करताना पैसा म्हणून करतात.





इंडियन लोक छोट्या छोट्या मोत्यांपासून माळा, पट्टे आणि गळपट्टे बनवतात.

ते या वस्तू आपल्या देशाच्या मूळ निवासींना शांततेचे प्रतिक म्हणून भेट करतात.

मग मला माझ्या डोक्यावरून उडत गेलेल्या सागरी पक्ष्याचा आवाज ऐकू आला. समुद्रात दूर कुठेतरी असलेल्या एका नावेचा आवाज ऐकू आला. आणि मग मला माझ्या बहिणीचा आवाज ऐकू आला.



“हे बघ!” बहीण म्हणाली.

“हा शिंपला बघ कसा चालतोय!”

मी तिकडे बघितलं.

एक मून शेल (चंद्र शिंपला) वाळूवर चालत होता.

एक हर्मिट खेकडा त्या शिंपल्यात शिरला होता.

तो शिंपल्याला आपलं घर म्हणून वापरत होता. तो वाळूत चालत असताना सोबत आपल्या पाठीवरचं घरसुद्धा घेऊन जात होता.

आम्ही खेकड्याला जवळून न्याहाळलं.

त्यानेसुद्धा आपल्या मोठ्या मोठ्या डोळ्यांनी आम्हाला न्याहाळलं.

मी बहिणीला म्हटलं की हर्मिट खेकडा आपलं मऊ शरीर सुरक्षित ठेवण्यासाठी या कठीण कवचाच्या शिंपल्यात शिरला असणार.

पण शरीराने वाढल्यावर या खेकड्याला त्याचं हे मून शेलचं घर अपुरं पडेल.

मग तो घराच्या शोधात एखादा मोठा शिंपला शोधू लागेल.



याच्यानंतर सापडलेले शिंपले सर्वात मोठे आणि सर्वोत्तम होते.

ते होते *व्हेल्क शेल्स*. ते एका बाजूला खुले होते.

आम्ही त्याचा खुला भाग कानाला लावला आणि ऐकू लागलो.

शिंपल्यातून सागराच्या लाटांचं गाणं ऐकू येत होतं

आणि हवेचा रोरावणारा आवाजसुद्धा!

हा शिंपला सापडल्यावर आम्हाला खूप आनंद झाला.

या शिंपल्याने आपल्या पोटात सागराचं गाणं जपून ठेवलं होतं.



हळूहळू सूर्यास्त होऊ लागला.

दिवस ढळू लागला.

भरतीच्या लाटा वाढू लागल्या.

समुद्राचं पाणी किनाऱ्याला वेढू लागलं.

आमच्या बादल्या शिंपल्यांच्या खजिन्याने भरून गेल्या.

म्हणून मग आम्ही घरी निघालो.





पावसाळी दिवसांत मित्र खेळायला घरी येतात,

तेव्हा आम्ही त्यांना आमचा शिंपल्यांचा खजिना दाखवतो.

आम्ही त्यांना शिंपल्यांची नावं सांगतो,

ते कुठे सापडले हे सांगतो.

आम्ही त्यांना समुद्रकिनाऱ्यावर आम्ही मारलेल्या फेरफटक्याची गोष्टसुद्धा ऐकवतो.



angel wings

एंजल-विंग्स



wedge shell

वेज-शेल



slipper shell

स्लिपर-शेल



top shell

टॉप-शेल



moon shell

मून-शेल



turret shell

टरेट-शेल



cockle shell

कॉकल-शेल



clam shell

क्लॅम-शेल



कवडी cowrie



scallop
स्कॅलोप



keyhole limpet
कीहोल-लिम्पेट



periwinkle
पेरिविंकल



wentletrap
वेंटलट्रॅप



jingle shell
जिंगल-शैल



whelk
व्हेल्क

मला माहितीय की मी शिंपल्यासारखं सुंदर घर कधीच बनवू शकणार नाही.

समुद्री जीव आपल्या सुरक्षेसाठी एवढी सुंदर घरं बनवतात.

त्यांचे आकार वेगवेगळे असतात.

ते रंगीबेरंगी असतात.

प्रत्येक जीव त्याला सोयीस्कर असं घर बनवतो.

आशा आहे की आम्ही पुन्हा समुद्रकिनारी येऊ तेव्हा समुद्राने तिथे आमच्यासाठी बरीच शिंपल्याची घरं आणलेली असतील..



# शिंपले कसे बनतात?

कधी कधी आपल्याला समुद्रकिनारी असे शिंपले सापडतात, ज्यांच्या पोटात जिवंत जीव राहात असतो. सहसा एखादे वादळ आल्यानंतर समुद्राच्या लाटा असे शिंपले किनाऱ्यावर आणतात.

एखादा जीव राहात असलेल्या शिंपल्यांना *मोलस्क (कालव)* म्हणतात.

अनेक तान्ही मोलस्क आपल्या आईच्या शरीरात असलेल्या अंड्यातून जन्माला येतात.

मोलस्कला पाठीचा कणा नसतो. त्याचे शरीर नाजूक आणि मुलायम असते. त्यामुळे तो लहान असतानाच आपल्या सुरक्षेसाठी सभोवती एक कठीण कवच बनवू लागतो. हे कवच समुद्राच्या वेगवान लाटा आणि शत्रुंपासून त्याचा बचाव करते. काही मोलस्क अंड्यात असतानाच आपले घर बनवू लागतात.

काही मोलस्क आपल्या घरात एकच भाग किंवा वॉल्व्ह बनवतात. या शिंपल्यांना *युनी-वॉल्व्ह* म्हणून ओळखतात. युनी म्हणजे एक. व्हेल्क आणि गोगलगायी यांच्या शिंपल्यांमध्ये एकच भाग असतो आणि त्यांना युनि-वॉल्व्ह म्हणतात.

क्लॅम आणि स्कॅलोप यांसारख्या मोलस्कच्या शिंपल्यात दोन भाग किंवा वॉल्व्ह असतात. दोन भाग असलेल्या या शिंपल्यांना *बाय-वॉल्व्ह* म्हणतात. बाय म्हणजे दोन. हे दोन भाग पाठीमागच्या बाजुला जोडलेले असतात. बाय-वॉल्व्ह एखाद्या पुस्तकासारखा उघडला जातो.

मोलस्कच्या शरीराचा एक विशेष भाग कठीण कवच बनवण्याचे काम करतो. या विशेष भागाला *मॅंटल* म्हणतात.

मॅंटल खरंतर मोलस्कची पातळ त्वचा असते. ती मोलस्कचे कोमल, मुलायम शरीर झाकण्याचे काम करते. मॅंटल शरीर आणि शिंपला यांच्या दरम्यान असते.

कधी कधी मॅंटल शिंपल्याच्या बाहेरच्या काठाला लागलेले दिसते. ते फडफडत्या झालरीसारखे दिसते आणि सुंदर आणि गडद रंगाचे असते.

शिंपला तयार करण्याचे द्रव्य मॅंटलमधून पाझरते. हे द्रव्य काही वेळाने कडक होते आणि त्याचे रुपांतर कठीण कवचाच्या शिंपल्यात होते. दिवसेंदिवस, मोलस्कचे मऊ शरीर आकाराने वाढत जाते तसतसे मॅंटलमधून अधिकाधिक द्रव्य बाहेर पडते. ते कडक झाल्यावर शिंपला आणखी मोठा होतो. मॅंटलमधून रंगीत द्रव्यही बाहेर पडते, ज्यामुळे शिंपल्यावर विविध गडद रंगांची नक्षी दिसते.

मॅंटलमधून बाहेर पडणारे बरेचसे द्रव्य हे चुना असते. याच्यामुळे शिंपल्याचे कवच कठीण बनते. मोलस्कला हा चुना त्याने खाल्लेल्या अन्नातून मिळतो, आपल्याला जेवणातून शरीर विकसित होण्यासाठी आवश्यक घटक मिळतात तसेच.

अशा प्रकारे समुद्रकिनारी सापडलेले सगळे शिंपले अशा जीवांनी बनवलेले असतात, जे कधी समुद्रात या शिंपल्यांच्या घरात राहात होते.

